हॉटेल आणि रेस्टॉरंट इत्यादि व्यावसायिकांना दिनांक १ मे १९९२ ते ८ सप्टेंबर १९९२ च्या कालावधीत नामंजूर केलेल्या पुनर्विक्री [रिसेल] व्यवहारांवरील विक्रीकर दायित्वासाठी प्रशासकीय सहाय्य मंजूर करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
वित्त विभाग
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
शासन निर्णय, क्रमांक- विकअ-११९६/प्र.क्र.७/कराधान-१.
दिनांक:- ३० जुलै १९९६.

प्रस्ताविक :-

मुंबई विक्रीकर अधिनियम, १९५९ च्या कलम ८ अन्वये सर्वसाधारणत: नोंदणीकृत व्यापाऱ्यांच्या सर्व विक्रीची उलाढाल प्रथम निश्चित करुन त्यामधून काही अटींचे अधीन राहून विनिर्दिष्ट केलेल्या उलाढालीची रक्कम वजा केल्यानंतर उर्वरित विक्री उलाढालीवर विक्रीकर लागू करण्याची कायदेशीर तरतूद केलेली आहे. हॉटेल, रेस्टॉरंट इत्यादि व्यवसाय करणाऱ्या व्यापाऱ्यांना विक्रीकर कायद्याच्या कलम १२अ अन्वये अभिप्रेत असलेले प्रमाणपत्र घेऊन त्यांना आवश्यक असणारा माल नोंदणीकृत व्यापाऱ्याकडूनच खरेदी केला असल्याचे सिध्द केल्यास हॉटेल, रेस्टॉरंट इत्यादिच्या आईस्क्रीम, अल्कोहोल विरहीत शीत पेये अथवा मद्य यांच्या विक्रीची उलाढाल एकूण उलाढालीमधून कर निर्धारणेसाठी वजा करण्यात येते. म्हणजेच त्यांना पुनर्विक्रीची सवलत मंजूर करण्याची तरतूद आहे. तथापि सन १९९२ च्या महाराष्ट्र अधिनियम क्रमांक-अकरा अन्वये मुंबई विक्रीकर अधिनियम, १९५९ च्या कलम १२अ मध्ये समाविष्ट केलेल्या उप कलम [४] अनुसार हॉटेल, रेस्टॉरंट इत्यादि व्यावसायिकांच्या पुनर्विक्रीची सवलत दिनांक १ मे १९९२ पासून रद्द करण्यात आली होती.

सन १९९२ च्या महाराष्ट्र अधिनियम क्रमांक-अकरा मधील काही सुधारणा तरतुदींना व्यापार, उद्योग क्षेत्राकडून विरोध दर्शविण्यात आला होता. परिणामत: सदर कायद्यामधील आक्षेपित तरतुदींना, शासनाने दिनांक ९ सप्टेंबर १९९२ पासून स्थगिती मंजूर केली होती. तथापि कलम १२अ च्या उपकलम [४] ची तरतूद दिनांक १ मे १९९२ पासून ८ सप्टेंबर १९९२ पर्यंतच्या कालावधीसाठी कायद्यामध्येच

अंमलात राहिल्यामुळे हॉटेल व रेस्टॉरंट इत्यादि व्यवसाय करणा-यांना सदर कालावधीत केलेल्या आईस्क्रीम, अल्कोहोल विरहित शीत पेये आणि मद्ये यांच्या पुनर्विक्रीच्या बाबतीत सवलत मिळू शकली नाही. परिणामत: हॉटेल व रेस्टॉरंट इत्यादिकांना दिनांक १ मे १९९२ ते ८ सप्टेंबर १९९२ या कालावधीसाठी आईस्क्रीम, अल्कोहोल विरहीत शीत पेये आणि मद्ये यांच्या पुनर्विक्रीवर सुध्दा विक्रीकर दायित्व निर्माण होऊन त्यासाठी विक्रीकर भरणा करणे अपरिहार्य झाले. या परिस्थितीचा काळजीपूर्वक विचार झाल्यानंतर मा. वित्तमंत्र्यांनी दिनांक ६ जुलै १९९५ रोजी विधानमंडळाला सादर केलेल्या सन १९९५-९६ च्या अतिरिक्त अर्थसंकल्पीय प्रस्तावाच्या वेळी हॉटेल व्यावसायिकांना त्यांच्या आईस्क्रीम, अल्कोहोल विरहीत शीत पेये आणि मद्य विक्रीच्या बाबतीत पुनर्विक्रीची सवलत नामंजूर झाल्यामुळे भराव्या लागणा-या विक्रीकरासाठी सवलत मंजूर करण्याचा प्रस्ताव जाहीर केला होता. या प्रस्तावाचे अनुषंगाने शासनाने, खाली नमूद केलेल्या पात्रतेच्या आणि अटींच्या अधिन राहून हॉटेल आणि रेस्टॉरंट व्यावसायिकांना प्रशासकीय सहाय्य मंजूर करण्याचा निर्णय घेतलेला आहे.

शासन निर्णय:-

हॉटेल रेस्टॉरंट, कॅटरर्स, क्लब्स् इत्यादि व्यवसाय करणा-या व्यापा-यांना दिनांक १ मे १९९२ पासून दिनांक ८ सप्टेंबर १९९२ पर्यन्तच्या कालावधीमधील आईस्क्रीम, अल्कोहोल विरहीत शीतपेये आणि मद्ये यांच्या पुनर्विक्रीची सवलत [रिसेल क्लेम्स] नामंजूर झाल्याच्या परिणामी निर्माण झालेल्या विक्रीकर दायित्वासाठी प्रशासकीय सहाय्य मंजूर करण्यात यावे.

२] प्रशासकीय सहाय्य मंजूर करण्यासाठी पात्र असणारे व्यापारी:-

ज्या हॉटेल, रेस्टॉरंट, कॅटरर्स, क्लब्स् यांचा व्यवसाय करणा-या व्यापा-यांनी दिनांक १ मे १९९२ ते ८ सप्टेंबर १९९२ या कालावधीत आईस्क्रीम, अल्कोहोल विरहीत शीतपेये आणि मद्ये यांची विक्री केलेली आहे परंतु मुंबई विक्रीकर अधिनियम, १९५९ च्या कलम १२अ च्या त्यावेळी अस्तित्वात असलेल्या उपकलम [४] अन्वये अशा प्रकारच्या

अन्न आणि पेयांच्या पुरवठ्याच्या बाबतीत ज्या व्यापा-यांना कर निर्ध
निर्धारणेमध्ये पुनर्विक्रीची सवलत [रिसेल] नामंजूर करण्यात आलेली आहे
असे हॉटेल, रेस्टॉरंट, कॅटरर्स, क्लबसुद्धा व्यवसाय करणारे व्यापारी या शासन
निर्णयानुसार मंजूर झालेले प्रशासकीय सहाय्य देण्यास पात्र ठरतात.

३. <u>प्रशासकीय सहाय्य मंजुरीच्या अटी</u> :-

[१] पात्र व्यापा-यांनी आईस्क्रीम, अल्कोहोल विरहीत शीतपेये आणि मद्ये यांची पुनर्विक्री करताना, ग्राहकांकडून तदसंबंधीच्या देयकांमध्ये विक्रीकराची स्वतंत्रपणे वसूली केलेली नसावी.

[२] प्रशासकीय सहाय्य मंजुरीची मागणी करणा-या व्यापा-यांनी जर अपिल अधिका-यांकडे दाखल केलेल्या अपिलांमध्ये पुनर्विक्रीची सवलत नामंजूर झाल्याचा मुद्दा उपस्थित केला असेल तर संबंधीत व्यापा-याने सदर अपिलांमधील पुनर्विक्री सवलत नामंजूरीचा मुद्दा रद्द करून अपिलाच्या कारणमिमांसेमध्ये योग्य ती दुरूस्ती केली असली पाहिजे.

४. <u>प्रशासकीय सहाय्य मंजूरीची मर्यादा</u> :-

या शासन निर्णयानुसार प्रशासकीय सहाय्य मंजूर करताना मुंबई विक्रीकर अधिनियम, १९५९ च्या कलम १२अ च्या उपकलम [४] च्या अंमलबजावणीच्या परिणामी लागू होणा-या व्यापा-यांवर निर्धारित केलेला निव्वळ विक्रीकर, व्याज आणि शास्ती यांच्या एकूण रकमेपेक्षा प्रशासकीय सहाय्याची रक्कम कोणत्याही परिस्थितीत जादा होणार नाही याची खात्री करण्यात यावी. सर्वसाधारणपणे प्रशासकीय सहाय्य मंजूर करताना त्याची रक्कम खालीलप्रमाणे परिगणित करण्यात यावी.

एक-नामंजूर केलेल्या पुनर्विक्री व्यवहारांवर लागू केलेला विक्रीकर

<u>वजा</u>- मुंबई विक्रीकर नियम, १९५९ च्या नियम क्रमांक-४२ जे अथवा इतर कोणत्याही नियमानुसार विक्री केलेल्या मालासाठी खरेदी केलेल्या मालावरील करासाठी मंजूर केलेली विक्रीकराच्या वजावटीची [सेट ऑफ] रक्कम.

<u>अधिक</u>- वर नमूद केल्याप्रमाणे निर्धारीत केलेल्या निव्वळ विक्रीकर रकमेवर लागू होणारी व्याजासहित शास्तीची रक्कम.

....४

५. प्रशासकीय सहाय्य मंजूर करणारी यंत्रणा :-

या शासन निर्णयानुसार प्रशासकीय सहाय्य मंजूर करण्याचे अधिकार विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना देण्यात येत असून आवश्यकतेनुसार सदर अधिकार आयुक्तांच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील अपर विक्रीकर आयुक्त, विक्रीकर उपआयुक्त [प्रशासन], सहायक विक्रीकर आयुक्त [प्रशासन], यांना अथवा त्या दर्जाखालील इतर संबंधीत अधिका-यांना हे अधिकार प्रदान करण्याची परवानगी विक्रीकर आयुक्तांना देण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

वि प्र कुलकर्णी

[ वि. प्र. कुलकर्णी ]
शासनाचे अवर सचिव.

प्रत,

माहितीसाठी व आवश्यक त्या पुढील कार्यवाहीसाठी सादर अग्रेषित.

१] विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, विक्रीकर भवन, माझगांव, मुंबई-४०० ०१० [ ४० प्रती ],

२] अपर विक्रीकर आयुक्त, विक्रीकर भवन, माझगांव, मुंबई-४०० ०१०.

३] महालेखापाल [लेखा परीक्षा]-१, मुंबई.

४] महालेखापाल [लेखा परीक्षा ]-२, नागपूर.

५] संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

६] अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

७] निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.

८] निवड नस्ती, करधान-१.